प्रकाशक —

वि. वा. शिरवाडकर
वाङ्मय विहार प्रकाशन
शिवाजी रस्ता, नासिक.

मुद्रक —

द. शं. पोतनीस
गांवकरी छापखाना,
ना सि क.

मुखपृष्ठ —

प्रतिभा ॲडव्हर्टायझर्स.
ना सि क.



प्रयोगासाठीं वाङ्मय विहार प्रकाशन,
शिवाजी रस्ता, नाशिक या पत्त्यावर
चौकशी करावी.

## प्रास्ताविक

'दिवाणी दावा' ही नाटिका अेका इंग्रजी अेकांकिकेच्या आधारें लिहिलेली आहे. नासिक येथील लोकहितवादी मंडळाच्या वार्षिक संमेलनासाठीं ती लिहिली आणि तिचा पहिला प्रयोगहि प्रस्तुत संस्थेच्या उत्साही कलावंतांनींच केला. या नाटिकेंतील मूलभूत कल्पना लोकवाङ्मयांतील असावी. ( जुन्या क्रमिक पुस्तकांतील 'गुरूची विद्या गुरूस फळली' ही गोष्ट अनेकांना आठवत असेल. ) दोन तीन शतकांपूर्वी फ्रान्समध्यें या कल्पनेवरती अेक नाटक लिहिण्यांत आलें व नंतर ती नाटिकेच्या रूपानें इंग्रजींत आली. मराठीच्या दृष्टीनें जरूर ते बदल करून व विशेषत: संमेलनादि प्रसंगाची आवश्यकता लक्षांत घेऊन प्रस्तुत रूपांतर केलें आहे. नाटिकेचें लेखन व तिचा प्रयोग या दोहीं-बद्दल, लोकहितवादी मंडळाचे कार्यकर्ते आणि कलावंत यांचे मी मन:पूर्वक आभार मानतों.

वि. वा. शिरवाडकर

'दिवाणी दावा' या नाटिकेचा पहिला प्रयोग लोकहितवादी मंडळ, नासिक या संस्थेच्या वार्षिक संमेलनांत ता. १–९–५२ रोजीं झाला. त्यांत पुढील कलावंतांनीं भूमिका केल्या:—

| | | |
|---|---|---|
| दौलत पाटील | : | श्री. दत्ता नाडगौडा |
| श्रीपत पाटील | : | श्री. भाऊ सोहोनी |
| शिरस्तेदार | : | श्री. माधव कुलकर्णी |
| संपतराव | : | श्री. य. के. खरे |
| कावळे वकील | : | श्री. अनिल महेंद्र |
| मुन्सफ | : | श्री. यशवंत हडप |

दिग्दर्शन : वि. वा. शिरवाडकर
साहाय्यक : श्री. मधुकर कुलकर्णी

———

[ एका खेडेगांवांतील दिवाणी कोर्टाचा आंतील भाग. कोर्टाचा दिवाणखाना मोठा व ऐसपैस असला तरी त्यांत आधुनिक वा कलात्मक दृष्टीचा मागमूस नाहीं. समोर मुन्सफसाहेबांचें उच्चासन असून त्याच्या डाव्या बाजूस आरोपीचा पिंजरा व उजव्या हातास शिरस्तेदाराचें टेबल आहे. उच्चासनासमोर कांहीं खुर्च्या व बाक समोरासमोर मांडलेले आहेत. वर छताला— शक्य असल्यास— एक पडद्याचा पंखा लावलेला आहे. प्रेक्षकांच्या उजव्या बाजूस कोपऱ्यांत मोठा दरवाजा आहे. पडदा उघडतो तेव्हां शिरस्तेदार टोपी मागें सारून कामकाजांत व्यग्र झालेला असतो. दरवाजांतून दौलत व श्रीपत बोलत बोलत प्रवेश करतात. दौलतचा पोशाख खेड्यांतील वयस्क, सुखवस्तू पाटलासारखा असून श्रीपतच्या वेषभूषेंत संतपणाची 'झांक' आहे. दौलत पाटील बोलतां बोलतां आवाज चढवूं लागतो. ]

दौलतराव : नाहीं– नाहीं– श्रीपत पाटील, माझ्या तोंडापुरतं बोलूं नका. जें तुमच्या बुद्धीला पटेल तें अगदीं बिनदिक्कत साक्षीमध्यें सांगा. आपला आग्रह नाहीं. या संपतरावाचा आणि माझा कांहीं दावा थोडाच आहे? आतां ओट्याला ओटा अन् भिंतीला भिंत लागली आहे तेव्हां झाल्या असतील अधेमधें कटकटी! पण त्याच्यासाठीं मी कधीं कोर्टाची पायरी चढलों कां? पण आतां हें अगदीं मर्यादेबाहेर चाललं आहे. त्याच्या घरीं पाहुणे आले म्हणून त्यानं काय माझी कोंबडी मारायची? ही काय मोंगलाई आहे? एक नाहीं, दोन नाहीं, तीन नाहीं... !

शिरस्तेदार : [ संत्रस्तपणानें वरती पाहून ] जरा हळू बोला हो— !

दौलत : मोठ्यानं कोण बोलतं आहे? मी? नाहीं बुवा! आपल्याला संवयच नाहीं ती! ( श्रीपत पाटलाकडे वळून ) तर मी काय म्हणालों—

एक नाहीं, दोन नाहीं, तीन नाहीं— माझ्या पांच कोंबड्या, गेल्या सहा महिन्यांत गडप झाल्या! पांच कोंबड्या! आतां बोला— कुठं गेल्या त्या— ?

**श्रीपत पाटील** : तो सर्वसाक्षी परमेश्वर जाणे! त्याच्या मनांत असल्यावर पांच काय, पांचशें कोंबड्या सहा महिन्यांत बेपत्ता होतील. आपणां माणसांना देवाची लीला कधीं उमगायची नाहीं. म्हटलंच आहे— 'तुका म्हणे काय। मानवाचें बळ। किडा वळवळ करीतसे ।। '

**दौलत** : या देवाच्या लीला नाहींत श्रीपत पाटील. या संपतरावाच्या लीला आहेत. आज टाकला बाजार तरी पांच कोंबड्यांची पांच सात पस्तीस रुपये किंमत झाली. माझे पस्तीस रुपये या साळसूद म्हाताऱ्यानं घशाखालीं घातले. नाहीं, मी म्हणतों षोक करा— कोंबड्याहि खा, पण दुसऱ्याच्या कां? हौस असेल तर पदरचे पैसे खर्च करावेत पाहुण्यांसाठीं!

**श्रीपत** : रास्त आहे! पण कां हो दौलतराव, तुम्ही नुकसान भरपाई किती मागितली आहे?

**दौलत** : सत्तावीस रुपये बारा आणे नऊ पै! शेवटच्या पैसकट सगळी रक्कम वसूल करून घेईन तेव्हांच राहीन मी! हा दौलत दादाजी म्हणजे कांहीं भोट नाहीं म्हणावं!

**श्रीपत** : सत्तावीस रुपये? एका कोंबडीबद्दल?

**दौलत** : मी म्हणतों, माझ्या कोंबडीची किंमत एक कवडीसुद्धां नसेल, कांहीं सोन्याचीं अंडीं घालणारी कोंबडी नव्हती ती! पण या संपत पाटलाला चांगली अद्दल घडवली पाहिजे. म्हणून वकीलाला सांगितलं कीं, सत्तावीस रुपये तर घालाच पण वर पावणे तेरा आणेहि असूं द्यात! म्हातारी मेल्याचं दुःख नाहीं श्रीपतराव, काळ सोकावतो!

**शिरस्तेदार** : (वैतागानें पुन्हां वर पाहून) जरा हलके बोला हो!

**दौलत** : मोठ्यानें कोण बोलत आहे? मी? छे बुवा! आपण नाहीं

कधीं मोठ्यानें बोलायचे ! ( श्रीपत पाटलाकडे वळून ) बरं मी म्हणतों मारली कोंबडी, पण कोंबडीच्या मालकाला जेवायला तरी बोलावशील का नाहीं ? सगळे सगेसोयरे बोलावले ! श्रीपत पाटील, तुम्हांलासुद्धां जेवायला बोलावलं आणि आम्हांला मात्र नाहीं ! कां ? कारण आमची कोंबडी ! ताटांत वाढल्यावर तिनं काय आमच्या अंगावर उडी मारली असती ? का आमच्याकडं गाऱ्हाणं केलं असतं ?

**श्रीपत** : बरोबर आहे. तुम्हांला जेवायला तरी बोलवायला हवं होतं—

**दौलत** : म्हणून म्हटलं, तुम्ही माझे साक्षीदार आहांत म्हणून कांहींहि खोटं सांगूं नका. तुम्ही त्या दिवशीं संपत पाटलाकडे जेवायला होतां– जेवायला कोंबडीचं कालवण केलं होतं– आणि ती कोंबडी माझी होती. बस्स ! खोटं सांगायचं कांहीं कारणच नाहीं.

**श्रीपत** : आणि कारण असलं तरी आपण कधींहि खोटं बोलणार नाहीं. मनुष्यदेहीं आल्यावर माणसानं निदान खरं तरी बोलावं ! आज सकाळीं संपतसुद्धां मोटार तळावर भेटला होता. तो म्हणाला, श्रीपत पाटील, खाल्ल्याघरचे वासे मोजूं नका. मी म्हटलं, "बाबा, आपल्याला घर माहीत नाहीं नि वासे माहीत नाहींत. ज्या मार्गानं ज्ञानदेव– नामदेव– तुकोबा गेले, त्या वाटेनं आपण जाणार! आपण खरं तें सांगणार! 'असत्याच्या माथां । पडो धोंडा देवा । असत्य गैरवा नेई नरा ॥ "

**शिरस्तेदार** : ( कागदपत्र बाजूला सारून ) दौलत दादाजी कोण ? तुम्हीच का ?

[ दौलत शिरस्तेदाराजवळ जातो. ]

**दौलत** : होय साहेब, मीच दौलत दादाजी. मुक्काम पोस्ट शिरगांव वाकडं !

**शिरस्तेदार** : बघूं कागद तुमचे ?

**दौलत** : [ कागद देऊन ] हे घ्या !

**शिरस्तेदार** : कोंबडी मारल्याबद्दल नुकसान भरपाई ?

दौलत : होय !

शिरस्तेदार : आज हा एकच दावा आहे. तुमचा प्रतिवादी कोण आहे ?

दौलत : संपतराव देशमुख— मुक्काम पोस्ट– शिरगांव वाकडं !

शिरस्तेदार : पण तुम्ही फौजदारी कां नाहीं केली ?

दौलत : मी म्हटलं पोलीस पाटलाला कीं मला फौजदारी करायची आहे. पण तो ऐकेच ना ! म्हणाला, दिवाणींत जा म्हणजे पांच पंचवीस रुपये किफायत तरी होईल. कोंबडी खायला तो स्वतः हजर होता ना ? म्हणून दिलं टोलवून इकडं !

शिरस्तेदार : ठीक आहे, तुम्हांला सही करतां येते कां ?

दौलत : म्हणजे काय बोलणं झालं ? चांगल्या सहा यत्ता पास झालों ना मी ! सातवीलाहि बसलों होतों, पण तेवढ्यांत लग्न झालं आणि शाळेंत रजा लागली. पुढें पहिला मुलगा झाला ...

शिरस्तेदार : तें राहूं द्या – इथं सही करा–

दौलत : ( सही करून ) तसा कोर्टकचेरीला मी बुजणारा नाहीं साहेब ! नाहीं म्हटलं तरी पांचसात वेळां साक्षी पुराव्याला येऊन गेलों आहे.

शिरस्तेदार : तुमचा वकील कोण ?

दौलत : तीच तर भानगड झाली आहे!

शिरस्तेदार : भानगड ?

दौलत : पिंपळवाडीचा जोशी वकील दिला होता मी. पण आज मधल्या नाल्याला पूर आल्यामुळं पिंपळवाडीच्या मोटारींच बंद झाल्या आहेत. आमचं नशीब शिकंदर म्हणून शिरगांवच्या नाल्याला तरी पूर आला नाहीं. साहेब, आमच्या शिरगांवला एक कोर्ट काढा की ! चांगलं चालेल !

शिरस्तेदार : कोर्ट म्हणजे आमची नाटक कंपनी आहे कीं काय ! चालो न चालो, आम्हांला काय त्याचं ?

**श्रीपत** : तेंहि बरोबरच आहे.

**शिरस्तेदार** : पण तुमचे वकील आले नाहींत, मग दावा कोण चालवणार ?

**दौलत** : आपणच चालवूं कीं ! तसा मी अडाणी बावळा नाहीं साहेब. अन् मी म्हणतों, वकील आला नाहीं हेंहि बरंच झालं ! कोंबडीपरी कोंबडी गेली शिवाय वर वकीलाची फी जायची ! नुकसान भरपाई मिळते कीं नाहीं देव जाणे !

**शिरस्तेदार** : पण तुम्हांला कसा चालवितां येईल दावा ? वकील असतां म्हणजे बरं होतं. अजून बघा एखादा.

**दौलत** : छे ! छे ! वकील तरी जास्त काय करणार आहे ? आपली फिर्याद खोटी थोडीच आहे ? खोट्याचं खरं करायचं असेल तर वकील हवा !

**शिरस्तेदार** : अहो, खऱ्याचं खरं करायला देखील वकील लागतो. हें कोर्ट आहे. देऊळ नाहीं कीं दर्गा नाहीं.

**दौलत** : पण साहेब, माझ्या डोळ्यांदेखत संपतरावानं कोंबडी मारली ना ?

**शिरस्तेदार** : पाटील बुवा, कोर्टांत दावा पुराव्यानं शाबीत व्हावा लागतो. तेथें तुमच्या डोळ्यांचा, कानांचा, नाकाचा, कांहीं उपयोग नाहीं. पुरावा पाहिजे.

**दौलत** : पुरावा आहे ना आपला ! हे श्रीपत पाटील–साक्षीदार म्हणून आले आहेत. संपत पाटलाकडे त्या दिवशीं जेवायला होते.

**शिरस्तेदार** : ठीक आहे. आतां नाहींच वकील तर चालवा बापडे तुम्ही ... पण हुशारीनं बोला जरा.

**दौलत** : तें होईल बरोबर. शिरगांवच्या तळावरच कळलं कीं, पिंपळवाडीच्या गाड्या आज बंद आहेत. तेव्हांपासून या नोटीशीच्या नकला आणि समन्सचे कागद सारखे वाचून काढतों आहे.

**शिरस्तेदार** : ठीक – ठीक !

दौलत : पण कां हो साहेब, – तुम्ही भले दिसतां म्हणून विचारतों. या कागदांत या भानगडी काय आहेत ?

शिरस्तेदार : कसल्या ?

दौलत : (कागद वाचीत) सदरहू ... सदर ...मयत ... मशारनिल्हे ... जेणें करून ... तेणें करून ...

शिरस्तेदार : कोर्ट–कचेरीची भाषा आहे ती पाटील बुवा ! असे शब्द उच्चारले म्हणजे वकील लोकांना जास्त अवसान चढतं.

दौलत : असं काय ? सदरहू प्रतिवादी...मयत कोंबडी ...मशारनिल्हे फिर्यादी... जेणें करून तुम्हीं आमची कोंबडी मारली तेणेंकरून ! वा! बोलायला मोठा जोर येतो खरा ! झालं, आतां वकील तरी जास्त काय बोलणार ? मी बरोबर मुन्सफसाहेबांना सांगतों कीं जेणेंकरून सदरहू संपतरावानं माझी मयत कोंबडी मारली आहे–

शिरस्तेदार : पाटील बुवा, असं कांहींहि करूं नका. जें सांगायचं असेल तें सरळ साध्या शब्दांत सांगा.

दौलत : म्हणजे काय बोलणं झालं ? मी कांहीं अडाणी नाहीं साहेब, चांगल्या सहा यत्ता पास झालों आहे. दाव्याचं काय होईल तें होवो, आज वकिली तर करायला मिळेल ! पण साहेब, पहिल्यांदा काय करायचं असतं ? आपल्याला नुसती पद्धत सांगा म्हणजे झाल !

शिरस्तेदार : पद्धतींत कांहीं कठीण नाहीं. साहेब सांगतील तेव्हां साक्षीदाराला प्रश्न विचारायचे आणि नंतर आपली फिर्याद काय आहे तें सांगायचं म्हणजे झालं.

दौलत : ठीक आहे – (स्वतःशीं पुटपुटत) जेणें करून सदरहू प्रतिवादीनं वादीची मयत कोंबडी मारली आहे ...

[संपतराव प्रवेश करतो. कोर्टाची बारकाईनें पाहणी करीत तो शिरस्तेदाराच्या टेबलाजवळ जातो. तोहि वृद्ध, सुखवस्तु, परंतु अधिक बनलेला दिसतो. तो येतांच दौलतराव बाजूला होतो.]

**संपत** : रामराम दौलतराव – रामराम साहेब – रामराम श्रीपत पाटील !

**शिरस्तेदार** : रामराम. तुम्ही या दाव्यांत आहांत वाटतं ?

**संपत** : आतां ओघानंच आलं तें ! किती वेळ आहे अजून खटला सुरु व्हायला ?

**शिरस्तेदार** : आहेत पंधरा वीस मिनिटं अजून ! नांव काय तुमचं ?

**संपत** : माझं ? माझं नांव संपतराव कोंडाजी –

**शिरस्तेदार** : अस्सं ? म्हणजे प्रतिवादी ! इथं सही करा.

**संपत** : (सही करून) साहेब, चांगलं हॉटेल कुठं आहे हो गांवांत ?

**शिरस्तेदार** : आहे वेशीजवळ.

**संपत** : म्हणजे जवळच आहे ! चला चहा प्यायला सगळी मंडळी ! चला साहेब – चला दौलतराव – चला श्रीपतराव !

**शिरस्तेदार** : चहा कसला पितां कपाळाचा ? आतां मुन्सफ येतील. तुमचाच एक खटला आहे आज !

**संपत** : खटल्याचं मुन्सफसाहेब पहातील हो. आपल्याला काय त्याचं ? इथं आल्यासारखे चहा तर घेऊं ! आपल्या शिरगांवला चांगलं हॉटेलच नाहीं. तरी मी उस्मानच्या भावाला म्हटलं-- उस्मान म्हणजे आपल्या दाऊदमियाचा पुतण्या– म्हटलं, तूं मोटार तळावर एक फर्मास चहाचं हॉटेल काढ. फार झकास चालेल, चला दौलतराव !

**दौलत** : (त्याच्याकडे न पाहतां) मी नाहीं येणार !

**संपत** : श्रीपत पाटील, तुम्ही चला. आतां पांच मिनिटांत परत येऊं !

**श्रीपत** : चला. चहाला आणि देवाच्या कीर्तनाला कधींहि नाहीं म्हणूं नये. हो, म्हटलंच आहे–'विठोबाच्या नांवा घेई जो माघार मारावे पैजार त्याच्या पाठी.'

[ दोघे जातात ]

**दौलत** : पाहिलंत ना साहेब, काय नमुना आहे तो ! माझ्या कोंबड्या चोरून वर मला रामराम करतो आहे आणि पुन्हा चहा प्यायला बोला-

वतो आहे. हिंमत आहे की नाहीं ? मी सांगतों साहेब, आपल्या साऱ्या तालुक्यांत या संपतरावासारखा वाह्यात माणूस सांपडायचा नाहीं.

शिरस्तेदार : दिसतंच आहे तें !

दौलत : दिसतंय् ! दिसतं आहे तें कांहींच नाहीं. आतां एकदां पिंजऱ्यांत उभा राहिला म्हणजे पहा गंमत त्याची ! लहानपणापासून मी ओळखतों त्याला. असा कांगावा करील, अशा थापा मारायला लागेल, कीं या कोर्टाच्या भिंतीदेखील गदगदा हलायला लागतील !

शिरस्तेदार : पाटीलबुवा, थापा मारल्यामुळं या भिंती हलल्या असत्या तर आतांपर्यंत एक चिरा जागेवर राहिला नसता. कोर्टांतील कामं म्हणजे थापा मारण्याच्या शर्यती !

दौलत : असं ? मग इथें न्याय कसा मिळायचा ?

शिरस्तेदार : कुणी सांगितलं तुम्हांला कोर्टांत न्याय मिळतो म्हणून ? इथं फक्त दरखास्ती आणि हुकुमनामे मिळतात. त्यांच्याबरोबर आला तर यायचा न्याय एकादे वेळीं...

[ कावळे वकील लगबगीनें प्रवेश करतात. त्यांचा वेष खेड्यांतील-जुन्या वकीलासारखा म्हणजे धोतर, लांब कोट व पगडी असा आहे. हातांमध्यें रुमालांत बांधलेलें दप्तर. ते घाईघाईनें शिरस्तेदाराकडे येतात. ]

शिरस्तेदार : या कावळे वकील...

कावळे : का हो ! आमची पगडी इथें सांपडली का तुम्हांला ?

शिरस्तेदार : पगडी ? मग ती डोक्यावर काय आहे ?

कावळे : डोक्यावर पगडीच आहे हो. पण परवां येथें आलों तेव्हां कांहींतरी अदलाबदल झाली. ( पगडी काढून हातांत घेतो ) ही पगडी दुसऱ्याच कोणातरी वकीलाची आहे. चांगली नवी पगडी होती हो माझी—

शिरस्तेदार : कुठं ठेवली होती ? डोक्यावरून नाहींना काढली कोणी ?

कावळे : डोक्यावरून कोण लेकाचा काढतो आहे ? परवां पिंपळ-

वाडीचे दोन वकील आले होते. इथलेहि दोघे होते. आम्ही सगळेजण पगड्या काढून अण्णाच्या हॉटेलांत मिसळ खात होतों. तेवढ्यांत कोणी तरी आमची नवी पगडी लांबविली असं दिसतंय् !

शिरस्तेदार : मग अण्णाला विचारा...

कावळे : (कुरकुर करीत) ही पगडी कांहीं बरोबर बसत नाहीं डोक्याला. आणि दुसऱ्याची पगडी घालून कामहि सुचत नाहीं बरोबर. कुणा तरी बेअक्कल वकीलाची पगडी दिसते ही !

शिरस्तेदार : तुम्ही या खटल्यांत आहांत वाटतं ?

कावळे : होय.

दौलत : (पुढें येऊन) रामराम वकीलसाहेब.

कावळे : रामराम-- रामराम-- काय पाटील, कुठल्या गांवचे तुम्ही ?

शिरस्तेदार : हे दौलत दादाजी...

दौलत : मुक्काम पोस्ट शिरगांव वाकडं.

शिरस्तेदार : आजच्या खटल्यांतले वादी आहेत.

कावळे : अस्सं.

दौलत : पण वकीलसाहेब, तुम्ही शिरगांवला गेल्या सालीं बाळकोबाच्या यात्रेला आला होतांत कीं-- मी कापडाचं दुकान घातलं होतं ना त्या यात्रेमधें !

कावळे : अस्सं !

दौलत : तर ! आणि तुम्ही चौदा वार मांजरपाट नेलं कीं माझ्याकडून--

कावळे : मीं ! छे बुवा, कांहींतरी गैरसमज झाला आहे तुमचा ! मी साऱ्या जन्मांत शिरगांवला कधीं गेलों सुद्धां नाहीं आणि यात्रेबित्रेचाहि नाद नाहीं आपल्याला !

दौलत : असं कसं होईल ? मला चांगलं आठवतं ना ! त्यावळीं पगडी नव्हती तुमच्या डोक्यावर. लांब खादीचा सदरा अन् पांढरी टोपी घालून तुम्ही आलां होतां. मला वाटलं पिंपळवाडीचा छगनमल मारवाडीच आहे ! कांद्याची चाल आहे त्याची !

**कावळे :** (वैतागानें) मी छगनमल मारवाडी नाहीं! आणि माझी कांद्याची, बटाट्याची, रताळ्याची कसलीहि चाल नाहीं.

**दौलत :** तें तर लगेच कळलं मला. पण मला अगोदर वाटलं कीं तुम्हीच छगनमल मारवाडी. मीं म्हटलं देखील तुम्हांला, कीं काय शेटजी, कांद्याची चाल यंदा कशी चालली आहे? तर तुम्ही म्हणालांत ठीक चालली आहे. मग मला तरी कसा उमज पडणार? मला वाटलं तुम्ही छगनमलच!

**कावळे :** मीं छगनमल नाहीं. तुमचं शिरगांव मी अजून कसं तें पाहिलं सुद्धां नाहीं. माझ्या शब्दावर विश्वास ठेवाल कीं नाहीं?

**दौलत :** मी कसा ऐकेन? गेल्याच सालची सगळी हकिगत ना ही! एवढं कसा विसरेन मी? चांगलं चौदा वार मांजरपाट तुम्हांला फाडून दिलं माझ्या हातानं मी! तुम्ही तुमच्या छकड्यांत कापड टाकलं अन् जरा वेळांने पैसे पाठवून देतों असं म्हणून निघून गेलांत.मी म्हटलं, छगनमल मारवाडी आहे- कांद्याची चाळ आहे- तेव्हां जातात कुठे पैसे? पण अजून अेक दिडकी मिळाली नाहीं त्या कापडाची. वर्षानंतर आज दिसतां आहांत पुन्हां तुम्ही!

**कावळे :** ( रागानें ) तुम्ही काय चेष्टा करतां आहांत का माझी?

**दौलत :** चेष्टा? चौदावार मांजरपाट ही चेष्टेची बाब नाहीं साहेब! त्याकाळीं मांजरपाट डोळ्याला दिसत देखील नव्हतं. तुम्ही छगनमल मारवाडी म्हणून तुम्हांला उधारीनं दिलं. चौदा दीडं अेकवीस रुपये येणं आहे माझं!

**कावळे :** ( संतापानें ) मी पुन्हां सांगतों... मी बजावून सांगतों—

**दौलत :** (संथपणें)मीहि बजावून सांगतों! मी काय असा अडाणी बाबळा आहे कीं काय? अेकदां पाहिलेला चेहरा कधींहि विसरायचा नाहीं मी. म्हणून मीहि बजावून सांगतों- माझे चौदा दिडं अेकवीस रुपये आधीं देऊन टाका. माझं मांजरपाट चोरून नेलंत-

कावळे : चोरून ! चोरून !! ( रागानें थयथया नाचत, खिशांतून घाईघाईनें कागद, पेन्सील काढतो ) – शिरस्तेदार, तुम्ही अैकतां आहांत ना ? हा शिरगांवचा इसम मला चोर म्हणतो आहे. माझी चारचौघांत बदनामी करतो आहे. हा कावळे वकील चोर ! खुद्द कोर्टांत बदनामी ! शिरस्तेदार ! तुम्हाला साक्षीदार म्हणून बोलावीन मी ! कोर्टांत खेचतों लेकाला !

शिरस्तेदार : वकीलसाहेब ! मी शिरस्तेदार आहे तेवढं पुरं आहे. आणखी साक्षीदार म्हणून मला इथे काम करायला वेळ नाही.तुमचं तुम्ही बघा काय तें !

कावळे : पण ही बदनामी आहे ! पिनल कोडाच्या ४९० व्या कलमानुसार चक्क बदनामी होते ही!मला, ह्या कावळे वकीलाला चोर म्हणतो आहे ! ते हे कुठें आहेत ! हे आलेच–( संपतराव व श्रीपत प्रवेश करतात. ) संपतराव, जरा इकडे या. एक क्षणभर थांबा... हं महाराज, आतां आपण काय म्हणालांत तें या सद्गृहस्थासमोर म्हणण्याची मेहेरबानी कराल काय ?

दौलत : नाहीं करणार– अन् सद्गृहस्थ कोण ? हा संपतराव ? वाहवा रे सद्गृहस्थ ! ठीकच आहे! ते सद्गृहस्थ कोंबडी चोरणारे आणि आपण सद्गृहस्थ मांजरपाट चोरणारे!

कावळे : ( टिपण करीत ) बस--बस ! हेंच हेंच हवं होतं मला ! माझं काम झालं. ऐकलंत ना संपतराव, मी मांजरपाठ चोरलं असं हे म्हणताहेत!

संपत : चोरलं तर चोरलं ! तें काय येवढं मनाला लावून घ्यायचं ?

कावळे : कुणी चोरलं ? बदनामी–– निव्वळ बदनामी आहे ही माझी ! कोर्टांत खेचतों त्याला. किती वाजले ? ( टिपण करीत ) वेळ, बारा वाजून सात मिनिटं, स्थळ–कोर्ट, साक्षीदार संपतराव देशमुख. संपतराव तुम्हीहि टिपण करून घ्या.

संपत : आपल्याला नाहीं बुवा लिहितां बिहितां येत शाळेंत घातलं होतं माझ्या बापानं मला.पण तिसऱ्या यत्तेंत गेलों अन् लग्न झालं. पुढं-
कावळे : तें राहूं द्या. पाटीलबुवा, आज वादी म्हणून इथे आलांत उद्यां प्रतिवादी म्हणून यावं लागेल हें लक्षांत ठेवा.
दौलत : माझ्या सारं कांहीं लक्षांत आहे. तें चौदावार मांजरपाट देखील चांगलं लक्षांत आहे माझ्या.मीच उद्यां फिर्याद दाखल करतों. हा दौलत दादा म्हणजे भोट आहे की काय ? मांजरपाट चोरायचं ते चोरायचं आणि वर फिर्यादीच्या धमक्या ? श्रीपत पाटील, चला चहा पिऊन येऊं !
श्रीपत : चला. चहाला आणि देवाच्या कीर्तनाला कधीं नाहीं म्हणूं नये !

[ दौलत व श्रीपत बाहेर जातात. ]

कावळे : जातांना तो पुन्हां काय बडबडलांत ते ऐकलंत ना
शिरस्तेदार : ( उठून ) मला नका बुवा कांहीं सांगूं ! मी कांही ऐकलं नाहीं अन् कांहीं पाहिलं नाहीं.
कावळे : माझ्या पगडीचं तरी लक्षांत ठेवाल ना ? आपली नजर असूंद्यात. कोरीकरकरीत आहे हो अगदीं !
शिरस्तेदार : ठीक आहे. करीन चौकशी.

[ बाहेर जातो. ]

कावळे : काय मनुष्य आहे हो ?
संपत : शिरस्तेदार ना ? फार वाह्यात आहे...
कावळे : शिरस्तेदार नाहीं हो...
संपत : दौलत ना ? तो तर नंबर एकचा डांबरट आहे. लहानपणापासून मी ओळखतों आहे त्याला.
कावळे : म्हणे मी बाळकोबाच्या जत्रेला गेलों होतों आणि याला वाटलें की मी छगनमल मारवाडी आहे !

संपत : छे! छे! छगनमल कुठं– तुम्ही कुठं !–

कावळे : कुठं का असेना,तो प्रश्न नाहीं! पण मी तुमच्या शिरगांवला कधीं पाऊल टाकलं नाहीं आणि हा दीडशहाणा धडधडीत म्हणतो, मी त्याचं मांजरपाट आणलं म्हणून? चांगली वकीलाची करामत दाखवतो त्याला आतां!

संपत : दाखवाच एकदां. पण तें राहू द्या. कावळेसाहेब, आपल्या खटल्याच काय करायचं? तुम्ही लवकर बोलावलं होतं. पण पहिल्या गाडींत कंडक्टरनं आंतच घेतलं नाहीं मला. नाहींतर ह्या दौलत बरोबरच आलों असतों. सरकारी मोटार झाल्यापासून माणसाची कदरच राहिली नाहीं. पूर्वीच्या जमान्यांत वकीलसाहेब...

कावळे : तें राहूं द्या हो. आत्तां मुन्सफ येतील. इकडे– या बाजूला या जरा. मी सांगतों तुम्हांला काय करायचं तें. ही पगडीं! वाटोळ्या डोक्यावर कांहींतरी त्रिकोणी--चौकोनी घातल्यासारखं वाटतं आहे– लेकाचा चोर म्हणतो मला! मी याचं मांजरपाट चोरणार!

संपत : साहेब तें मांजरपाट राहूं द्या आतां. आपल्या दाव्याचं सांगा लवकर. नाहींतर दौलतची कोंबडी मारल्याबद्दल सत्तावीस रुपये भुर्दंड भरावा लागेल मला! चार रुपड्याचं कोंबडं आणि सत्तावीस रुपये नुकसान भरपाई, हा काय न्याय झाला?

कावळे : म्हणजे तुम्ही खरोखरच कोंबडी मारली वाटतं?

संपत : हो मारली. खोटं कशाला सांगू?

कावळे : पण रविवारीं तुम्हीं मला सांगितलत, कीं मी कोंबडी मारली नाहीं म्हणून!

संपत : रविवारीं आपली तब्येत नसते बरोबर साहेब! रविवारचें कांहीं सांगूं नका! रविवारीं काय केलं तें सोमवारींसुद्धां आठवत नाहीं आपल्याला!

कावळे : अच्छा, तुम्हीं कोंबडी मारलीत तर! पण तें कांहीं असो, तुम्हांला शपथ घ्यावी लागेल!

संपत : शपथ कसली ?

कावळे : खरं बोलण्याबद्दल !

संपत : आपण नाहीं खरं बोलायचे ! खरं बोलायचं अन् सत्तावीस रुपये भुर्दंड भरायचा ? छट् !

कावळे : अहो, खरं बोलूं नका. पण खरं बोलेन अशी शपथ घ्याल कीं नाहीं ?

संपत : म्हणजे खरं बोलायची शपथ घ्यायची अन् मग खोटं बोलायचं ? छे ! शपथ घेतल्यावर आपण नाहीं खोटं बोलणार !

कावळे : अहो पाटील, खरं आणि खोटं काय करीत बसलां ?

संपत : नाहीं ! खरं बोलायची शपथ एकदां घेतली म्हणजे नंतर मान कापली तरी आपण खोटं बोलायचे नाहीं ! तुमच्या या शपथेपायीं सत्तावीस रुपये घालवून बसूं कीं काय ? छे ! छे ! आपण शपथ न घेतां खोटं बोलणार. खोट्या शपथा घ्यायच्या म्हणजे काय ? कांहीं देव, धर्म, कूळ, रीत आहे कीं नाहीं ?

कावळे : [ वैतागानें ] ही पगडी आहे कीं पाखरांचं घरटं आहे कोणास ठाऊक ?— अहो पाटील. मग आतां केस लढवायची कशी ? मग सांगणार काय तुम्ही जबानींत ?

संपत : मी सांगेन कीं दौलतनें मला कोंबडी मारतांना पाहिलं हें खोटं !

कावळे : पण दौलत शपथ घेईल–

संपत : तो लाख शपथा घेईना ! त्याला काय मांजराचे डोळे आहेत काय अंधारांत पाहायला ? मी साफ मुन्सफांना सांगेन कीं मी ह्याची कोंबडी मारली तेव्हां काळोख इतका दाट होता कीं...

कावळे : महाराज, हात जोडतों तुम्हांला ! असं कांहीं सांगूं नका. खटला हातांतून जाईल आणि खर्चासकट सर्व रक्कम भरून द्यावी लागेल. हे पहा, संपत पाटील, तुम्ही शपथ घ्यायला अन् मी सांगेन तसं बोलायला तयार असलां तर ठीक, नाहींतर हे तुमचे कागद आत्तां

बाहेर जाऊन कचऱ्याच्या कुंडींत फेकून देतों. अगोदरच या पगडीनं भंडावलं, त्यांत तो हरामखोर मांजरपाट चोरल्याचा माझ्यावर आळ घेऊन गेला– आणि आतां तुम्ही गाढवासारखे—

संपत : वकीलसाहेब, आम्ही अडाणी माणसं, असे रागावूं नका बुवा ! म्हणजे हा कसा काय हिशेब झाला ? तुम्हांला फीचे पैसे द्यायचे आणि वर तुमच्या शिव्याहि खायच्या ?

कावळे : बरं, पैसे तरी आणले आहेत ना ?

संपत : वा ! तें कसें विसरेन मी? खटला जिंकला, कीं ठरल्याप्रमाणं- इथल्या इथं वीस रुपये चुकते करीन मी !

कावळे : खटला जिंकला कीं ? अहो पाटील, तुम्ही खटला जिंकलांत किंवा हरलांत तरी वकीलाची फी द्यायलाच हवी !

संपत : हें काय बोलणं झालं ? खटला हरला तर आपण एक दिडकी द्यायचे नाहीं. म्हणजे दौलतचे सत्तावीस रुपये भरायचे अन् शिवाय तुमचे वीस !

कावळे : हें पहा संपतराव देशमुख ! ही ठकबाजी चालायची नाहीं. खटल्याचा निकाल कसाहि लागला तरी रोख वीस रुपये तुम्हांला द्यावे लागतील! कबूल असेल तर पहा, नाहींतर मी हा चाललों साडेबारा- च्या मोटरनं !

संपत : बरं बुवा. राहिलं आमचं ! देऊन टाकूं पैसे. मग तर झालं ? पण एक तरी करा आतां ! खोटी शपथ मात्र मला घ्यायला लावूं नका ! तरच तुमची सगळी फी चुकती करीन.

कावळे : अहो पण-- शपथ घेतल्याशिवाय मुन्सफ पुढं तुमचं कांहींहि ऐकणार नाहीं.

संपत : मी सांगेन माझा घसा बसला आहे म्हणून ! मला बोलतांच येत नाहीं.

कावळे : हें तुम्ही तुमच्या तोंडानं सांगणार? कपाळ माझं ! हूं! मी असं सांगितल तर-- तर चालेल एकवेळ-- ही पगडी कांहीं सुचूं देत नाहीं. (पगडी काढतो ) शपथ चुकवायची असेल तर असंच कांहींतरी केलं पाहिजे खरं ! काय करावं बरं ? हं बरोबर ! छान सुचलं !

संपत : काय?

कावळे : मी आतां तुम्हांला गाढव म्हणालों ना, त्यावरून सुचलं !

संपत : कोण गाढव ? अरे वा, तुम्हांला फीचे पैसे द्यायचे, आणि वर...

कावळे : तें राहूं द्या हो ! मला छान युक्ति सुचली आहे. वीस नाहीं तीस रुपये फी द्यायला हवी तुम्ही ! शपथच काय, एक अक्षर न बोलतां खटला जिंकाल तुम्ही !

संपत : असं ? मग फार उत्तम ! पण फी मात्र वीस रुपयेच हं !

कावळे : चालेल ! हे पहा, कोर्टानं किंवा इतर कोणीही तुम्हांला कांहीं विचारलं, कीं तुम्ही गाढवासारखं ओरडायचं ! बस्स्, येवढं एकच करायचं ! कोणी कांहींहि प्रश्न विचारला, कीं गाढवासारखा आवाज काढा !...

संपत : म्हणजे तुमच्याप्रमाणं मुन्सफसाहेबहि मला गाढव म्हणतील आणि कोर्टाबाहेर हांकलून लावतील ! छट् ! भलतंच ! आपल्याला बैला-सारखं ओरडायला सांगा... शेळीसारखं सांगा... कोंबड्यासारखं सांगा... पण हें नाहीं परवडायचं आपल्याला !

कावळे : [ टाळी वाजवून ] कोंबड्यासारखं? वाहवा ! वाहवा ! बरोबर ! तुम्ही कोंबड्यासारखाच आवाज काढा. तुम्ही कोंबडी मारली आहे तेव्हां कोंबड्याचाच आवाज काढणं योग्य ! तुम्ही येवढं करा. नंतर काय मखलाशी करायची ती मी बरोबर करीन. काम फत्ते-- कोणीहि कांहींहि विचारलं, कीं मान उंच करायची आणि म्हणायचं ' कुकूऽऽच्च कू '! आलं ध्यानांत ?

संपत : ( त्याचं अनुकरण करीत ) कुकूऽऽच्च कू !

**कावळे :** छान ! उत्तम ! खटला जिंकला म्हणून समजा ! बरं का हो ! त्या दौलतचा वकील आला नाहीं हें खरं ना ?

**संपत :** कुकूऽऽच कू.

**कावळे :** माझ्याशीं नीट बोला हो ! वकील आला नाहीं ना त्याचा ?

**संपत :** नाहीं आला. पिंपळवाडीच्या गाड्या आज बंद आहेत.

**कावळे :** छान ! म्हणजे ते राजेश्री स्वतःच खटला चालविणार तर ! ठीक, उलट तपासणींत त्याचा निकाल लावून टाकतों. संपत पाटील, आज पंधरा मिनिटांत खटला जिंकून दाखवतों तुम्हाला. आज मुन्सफसाहेबांकडे त्यांचे जांवई पाहुणे आले आहेत, तेव्हां त्यांना आहे घरीं जाण्याची घाई ! मी तपास करून ठेवला आहे. पांच मिनिटांत ते वैतागून दाव्याचा निकाल देऊन टाकतील. छान ! हें छान जमलं ! ही मंडळी आली. साहेबहि आलेले दिसतात. इकडे या बाजूला व्हा जरा.

[ शिरस्तेदार, दौलत पाटील व श्रीपत पाटील प्रवेश करतात. ]

**शिरस्तेदार :** दौलतराव, इथं समोर बसा त्या टेबलाजवळ !

**दौलत :** होय, साहेब !

**शिरस्तेदार :** संपतराव, तुम्ही इकडे या बाकांवर बसा.

**संपत :** ( हलक्या आवाजांत) कुकूऽऽच कूऽऽऽ

**शिरस्तेदार :** ( आश्चर्यानें त्याच्याकडे पहात ) काय ?

**संपत :** कुकूऽऽच कूऽऽऽ

[ शिरस्तेदार स्तिमित होऊन संपतरावाकडे पाहतो. दौलत व संपत आपापल्या जागीं बसतात. तेवढ्यांत कांहीं प्रेक्षक प्रवेश करतात व बांकावर बसतात. श्रीपतरावहि बांकावर बसतो. प्रेक्षकांच्या पाठोपाठ पट्टेवाला आंत येतो व पुकारतो ]

**पट्टेवाला :** मुन्सफसाहेब आ रहे है.

[ न्यायाधीश येतात व इकडे तिकडे न बघतां सरळ आपल्या जागेवर जाऊन स्थानापन्न होतात. सर्व लोक उभे राहतात व न्यायाधीशी

बसल्यावर खालीं बसतात. न्यायाधीशाचा वेष, विजार–कोट–जाकीट व डोक्यावर विटका जरीचा रुमाल असा आहे. त्यांच्या आविर्भावावरून ते लवकरच सेवानिवृत्त होणार असून सध्यां नाईलाजानें काम करीत आहेत असें दिसतें. त्यांना एका कानानं चांगलं ऐकायला येत नाहीं. शिरस्तेदार न्यायाधीशांच्या टेबलावर कांहीं कागदपत्र ठेवतो व त्यांच्याशीं कांहीं कुजबुज करतो. ]

**दौलत :** [ स्वतःशीं ] दावा चालवतांना आपण मुन्सफसाहेबांना काय म्हणायचं असतं कुणास ठाऊक ? दुसरा वकील बोलायला लागला म्हणजे कळेल. तोंपर्यंत आपण आपलं सरकार म्हणावं हें बरं ! सरकार-- का सरदार? सरदारहि असेल कदाचित् ठीक ! आपण दोन्ही म्हणूं.

**मुन्सफ :** ( शिरस्तेदारास ) अस्सं ! हा एकच खटला आहे ना ? कागदपत्र पाहिले आहेत मी ! चला लवकर आटोपा. फिर्यादीचे वकील कोण आहेत ?

**शिरस्तेदार :** वकील येऊं शकले नाहींत–

**मुन्सफ :** येऊं शकले नाहींत ?

**दौलत :** नाल्याला पूर आल्यामुळें ते येऊं शकले नाहींत सरकार !

**मुन्सफ :** [ एक कान पुढें करून ] पेल्याला पूर ? कसला पेला ?

**दौलत :** पेल्याला नव्हे, नाला सरकार !

**मुन्सफ :** बरं, मग तुम्हींच तुमचा दावा चालविणार आहांत का ?

**दौलत :** होय सरकार !

**मुन्सफ :** ठीक आहे. साक्षीदाराला पुकारा !

**शिरस्तेदार :** श्रीपत पाटील...

**पट्टेवाला :** श्रीपत पाटीऽऽऽल [ श्रीपत पाटील उठतात व पिंजऱ्यांत उभे राहतात, स्वतःशींच काहीं पुटपुटतात व नमस्कार करतात. ]

**मुन्सफ :** तुमचं नांव श्रीपत पाटील सयाजी ?

**श्रीपत :** होय साहेब !

मुन्सफ : म्हणा, देवाशपथ खरं सांगेन–

श्रीपत : देवाशपथ खरं सांगेन--

मुन्सफ : खोटं सांगणार नाहीं--

श्रीपत : प्राण गेला तरी खोटं सांगणार नाही--

मुन्सफ : कोण गेला तरी ? जरा मोठ्यानं बोला. मला नीट ऐकायला येत नाहीं.

श्रीपत : प्राण गेला तरी !

मुन्सफ : बरं चालेल! हं, दौलत दादाजी, साक्षीदाराला काय विचारायचं तें विचारा.

दौलत : (ऐटींत कागदपत्र घेऊन उभा राहातो) आतां असे वकीलासारखे डावपेचाचें प्रश्न विचारतों... कायहो तुम्ही राहाणार कुठले ?

श्रीपत : हें काय विचारणं झालं ? जिथले तुम्ही तिथलेच आम्ही !

दौलत : आम्ही शिरगांवचे...

श्रीपत : आम्हीहि शिरगांवचेच !

दौलत : अस्सं. एकूण तुम्ही शिरगांवचे राहणारे ! नाहीं म्हणूं नका.

श्रीपत : नाहीं म्हणतंय कोण ?

दौलत : नाहीं, आपलं सांगून ठेवतों. बरं तुम्ही शिरगांवचे राहणारे, तर तुम्हांला संपत पाटील देशमुख माहीत असतील ?

श्रीपत : हो. चांगले ठाऊक आहेत.

दौलत : ठीक. आतां असं सांगा, त्या संपत पाटलाला काय काय आवडतं हो ?

श्रीपत : पुष्कळ गोष्टी आवडतात. नाच आवडतो– तमाशा आवडतो-- सिनेमा आवडतो- चहा आवडतो.

दौलत : तसं नाहीं हो. माझा विचारायचा मतलब असा, कीं त्यांना कोंबडीचं कालवण आवडतं कीं नाहीं ?

श्रीपत : तें तर फार आवडतं !

दौलत : ठीक, तुम्हांला ?

श्रीपत : आपल्यालाहि आवडतं ! खोटं कशाला सांगू? 'असत्याचा माथां पडो धोंडा---

दौलत : तें राहूं द्या, तुम्ही संपत पाटलाच्या घरीं गेल्या आषाढांत जेवायला गेला होतां कां ?

श्रीपत : गेलों होतों.

दौलत : ठीक ! जेवायला काय होतं ?

श्रीपत : कोंबडी होती. तुमच्या घरून चोरून आणलेली !

मुन्सफ : काय ? नीट ऐकायला नाहीं आलं–

श्रीपत : (तोंडाला हात लावून मोठ्यानें) कोंऽबऽडी ! यांच्या घरून चोरलेली!

मुन्सफ : च्-च्-विचारलेल्या प्रश्नांचं तेवढं उत्तर द्या.चोरून आणलेली वगैरे कांहीं सांगू नका !

श्रीपत : पण चोरूनच आणली होती साहेब ती ! खऱ्याला काय भीति ? संपतनें आदल्या दिवशीं रात्रीं चोरून आणलीं तीं !

मुन्सफ : थांबा, थांबा, वाटेल तें बोलूं नका. कोणतीहि गोष्ट अद्याप सिद्ध झाली नाहीं.जेवायला कोंबडी होती अितकंच तुम्हांला ठाऊक आहे.

श्रीपत : पण साहेब, कोंबडी चोरल्याशिवाय जेवायला कोंबडी येईल कुठून ?

मुन्सफ : थांबा हो! दौलत दादाजी, साक्षीदाराला मीच प्रश्न विचारतों !

दौलत : होय सरदार... ( खाली बसतो. )

मुन्सफ : हें पहा, तुम्ही कोणत्या दिवशीं जेवायला गेलां होतां हें सांगाल काय ?

श्रीपत : संपतनें कोंबडी चोरली त्याच्या दुसऱ्या दिवशीं !

मुन्सफ : थांबा हो ! चोरीचं वगैरे येवढ्यांत कांहीं बोलूं नका.जेवायला कोणत्या दिवशीं गेलां होतां ? वार... तारीख... तिथी...

**श्रीपत** : वार, तारीख नाहीं आठवत साहेब. दुसऱ्या दिवशीं गेलों होतों येवढं खरं !

**मुन्सफ** : दुसऱ्या दिवशीं म्हणजे कोणत्या दिवशीं ?

**श्रीपत** : आदल्या दिवशीं रात्रीं संपतनें कोंबडी मारली त्याच्या दुसऱ्या दिवशीं...

**मुन्सफ** : ( हतबुद्ध होऊन ) ठीक, ठीक ! बरं संपतनं कोंबडी चोरली हे तुम्हांला कसं कळलं ?

**श्रीपत** : मला या दौलतनंच सांगितलं ना ? तो कसा खोटं बोलेल ?

**मुन्सफ** : नो, नो धीस् वोन्ट डू ! अच्छा, चला तुम्ही खालीं. बरं दौलत पाटील, तुम्हांला काय सांगायचं असेल तें सांगा !

**दौलत** : होय सरदार. ( उठून ) मी शिरगांव वाकड्याचा राहणारा. माझा धंदा शेती आणि व्यापार. माझ्याजवळ एकूण तेरा सदरहू कोंबड्या होत्या. त्यांतल्या पांच गेल्या सहा महिन्यांत बेपत्ता झाल्या. माझा मशारनिल्हे शेजारी सदरहू संपतराव हा होय. तो माझ्या मयत कोंबड्या मारतो व खातो असा संशय मला आला आणि म्हणून मी त्याच्यावर पाळत ठेवली. मशारनिल्हे पांच कोंबड्यांतील पांचवी कोंबडी ही दोन वर्षें वयाची होती. तिनं गेल्या वर्षांत एकंदर सत्तावन्न सदरहू अंडीं घातलीं होतीं. त्यांतील पस्तीस मी बाजारांत विकलीं, पांच फौजदाराला दिलीं, सात गांवांतल्या...

**मुन्सफ** : (त्रासून) दौलत दादाजी, अंड्यांचा हिशेब इथें सांगू नका हो! वेळ थोडा आहे. त्या कोंबडीबद्दल बोला.

**दौलत** : होय सरकार, तात्पर्य हें कीं माझी मयत कोंबडी...

**मुन्सफ** : कसली कोंबडी ?

**दौलत** : मयत कोंबडी ! तात्पर्य हें, की माझी ती मयत कोंबडी सदरहू संपतरावानें चोरली. ( कावळे वकील खालीं मान घालून हसूं लागतात) कां, फार हसूं येतंय् ? पण तें मांजरपाट मी विसरणार नाहीं !

मुन्सफ : काय- मांजर? तुमची कोंबडी संपतरावानें मारली की मांजरानें ?

दौलत : संपतरावानें सरकार...

मुन्सफ : मग मध्येंच या मांजराच्या गोष्टी आणूं नका. सांगायचं तें मुद्देसूद सांगा. बरं संपतरावानें कोंबडी मारली हें तुम्ही कशावरून म्हणतां ? तुम्ही स्वतः पाहिलंत ?

दौलत : होय सरकार-मला सदरहू संपतरावाचा संशय आला, आणि मी त्याच्यावर पाळत ठेवली. ज्या दिवशीं संपतनें कोंबडींचं जेवण केलं, त्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं... म्हणजे आषाढ कृष्ण नवमीला त्यानें माझी कोंबडी चोरली. जेणेंकरून त्यानें माझी कोंबडी ( कावळे वकील हंसतात ) हंसा, हंसा, पण याद राखा- मी याचं उट्टं काढीन !

मुन्सफ : हे काय मध्येंच ! कशाबद्दल बोलतां आहांत तुम्ही ?

दौलत : माझ्या मांजरपाटाबद्दल सरकार ! चौदा दीडं एकवीस रुपये रक्कम होते त्याची !

मुन्सफ : (बुचकळ्यांत पडून) तुम्ही काय म्हणतां आहांत कांहीं कळत नाहीं ! कोंबडीचं काय झालं तें सांगा पाहूं !

दौलत : होय सरदार – होय सरकार. संपतरावानं माझी कोंबडी चोरलेली आणि मारलेली मी माझ्या डोळ्यानं पाहिली. आमच्या उत्तरेकडच्या भिंतीला एक फट आहे. त्या सदरहू फटींतून मी पाहात होतों. जेणें करून माझी कोंबडी – (कावळे हंसतात) घ्या हंसून ! पण माझा चौदा वार माल तुम्ही चोरलांत त्याचे पैसे वसूल केल्याशिवाय मी राहणार नाहीं !

मुन्सफ : (रागानें) चौदा वार ? चौदा वार लांबीची कोंबडी कोणीं बापजन्मीं ऐकली होती कां ?

दौलत : कोंबडी चौदा वार नव्हती सरकार, मांजरपाट चौदा वार !

मुन्सफ : काय घोंटाळा आहे कांहीं ध्यानांत येत नाहीं. तुमचे वकील आले असते तर फार बरं झालं असतं. हें पहा, तुम्हीं नेमकं काय पाहिलं तें सांगा !

**दौलत** : होय सरकार, संपतरावानं माझी कोंबडी मारलेली व चोरलेली मी पाहिली आणि जेणेंकरून माझी मयत कोंबडी मशारनिल्हे प्रतिवादीनं अगोदर मारली आणि नंतर चोरली -- नाहीं अगोदर चोरली आणि नंतर मारली– (कावळे हंसतात) -- हं, आज कशा उकळ्या फुटताहेत ! पण माझं मांजरपाट छकड्यांत घालून पळविलं तेव्हां नाहीं हंसायला आलं ?

**मुन्सफ** : छकड्यांत ? तुमची कोंबडी छकड्यांत घालून पळविली ?

**दौलत** : कोंबडी नाहीं सरकार -- मांजरपाट. माझं मांजरपाट छकड्यांत घालून पळविलं. चौदा वार मांजरपाट !

**मुन्सफ** : अहो, पण हें मांजरपाटाचें प्रकरण आहे काय ? तुम्हांला असं म्हणायचं आहे कां कीं तुमच्या कोंबडीची किंमत चौदा वार मांजरपाटाइतकी होती ? कोंबडी विकून आलेल्या पैशांत चौदा वार मांजरपाट आलं असतं असं कांहीं तुम्हांला सांगायचय् कां ? ठीक आहे. आलंहि असतं. पण त्यांच्याशी तूर्त आपल्याला कर्तव्य नाहीं.

**दौलत** : सरकार,मला मांजरपाटाशींच कर्तव्य आहे.चौदा दीडं एकवीस रुपये होतात त्याचे –

**मुन्सफ** : बरं बरं ! कबूल आहे. पण हें पहा पाटील, आधीं कोंबडी, मग मांजरपाट–

**दौलत** : नाहीं सरकार ! आधीं मांजरपाट मग कोंबडी ! मांजरपाट गेलं तें गेल्यावर्षी – माघाच्या महिन्यांत !

**मुन्सफ** : (नाद सोडून ) मला वाटतं तुमची जबानी आतां पुरे झाली, वेळ थोडा आहे. मांजर काय, छकडा काय, अन् मांजरपाट काय ? कावळे वकील, विचारा तुम्हाला काय विचारायचं तें.

**कावळे** : होय साहेब. ( दौलतकडे वळून ) आषाढाच्या नवमीला संपतनं तुमची कोंबडी चोरलेली व मारलेली तुम्ही पाहिली असं तुमचं म्हणणं आहे, नाहीं का ?

**दौलत** : होय –

**कावळे** : ही चोरी रात्रीं झाली असं तुम्ही सांगितलं. सुमारें किती वाजले असतील त्या वेळीं ?

**दौलत** : असेल अकरा – बाराचा सुमार !

**कावळे** : बरं, चांदणं होतं कां हो तेव्हां ?

**दौलत** : नाहीं !

**कावळे** : संपतरावाजवळ कांहीं कंदील वगैरे होता का ?

**दौलत** : नाहीं !

**कावळे** : संपतच्या डोक्याला पागोटं होतं कां ?

**दौलत** : संपतरावच अंधारांत दिसला नाहीं तर पागोटं काय दिसतं ?

**कावळे** : अस्सं ! फार अंधार होता वाटतं ?

**दौलत** : भयंकर ! डोळ्यांत बोट घातलं असतं तरी दिसलं नसतं !

**कावळे** : बरं, तुम्ही ज्या फटींतून पाहिलंत ती केवढी मोठी आहे?

**दौलत** : लहान आहे, बोट जाईल अशी !

**कावळे** : तुम्हांला फटींतून नेमकं काय दिसलं तें सांगाल कां ? संपत दिसला नाहीं, असं तुम्ही आतांच सांगितलं. काय दिसलं मग ?

**दौलत** : संपतरावानें कोंबडी मारलेली दिसली !

**कावळे** : म्हणजे त्या अंधारांत साडे पांच फूट उंचीचा संपत दिसला नाहीं पण फूटभर लांबीची कोंबडी दिसली ! असंच ना ?

**दौलत** : कोंबडी दिसली नाहीं !

**कावळे** : म्हणजे खरोखर तुम्हांला अंधाराशिवाय दुसरं कांहींहि दिसलं नाहीं, मग कोंबडी संपतनं मारली हें कशावरून ?

**दौलत** : मी ऐकलं ! संपतराव शिव्या देत माझ्या कोंबडीची मान मुरगाळीत होता. मी संपतरावाचा आवाज ऐकला आणि कोंबडीचाहि आवाज ऐकला.

**कावळे** : अस्सं ! म्हणजे कोंबडी मारलेली तुम्ही पाहिली नाहीं तर ! मारलेली ऐकली !

**दौलत :** हो, मारलेली ऐकली !

**कावळे :** म्हणजे मारलेली पाहिली हें खोटं ?

**दौलत :** मारलेली ऐकली !

**कावळे :** म्हणजे तुम्ही कांहीं माणसाचे व कांहीं कोंबडीचें आवाज ऐकले आणि तुम्हांला वाटलं कीं आपली कोंबडी मारली जात आहे.

**दौलत :** मीं मारलेली ऐकली !

**कावळे :** बरं आतां सांगा — एखाद्या बोक्यानं कोंबडीवर झडप घातली तर तिचे त्या वेळचे आवाज कांहीं वेगळे असतील कां ?

**दौलत :** वेगळे कसे असतील ? जीव जातांना एकच आवाज यायचा ! मग तो बोका असो नाहीं तर संपतराव असो.

**कावळे :** ठीक आहे. म्हणजे हेंहि शक्य आहे— तुमच्या कोंबडी मागं एकदा बोका लागला होता आणि संपत त्या बोक्याला उद्देशून शिव्या देत होता. असं असूं शकेल ना ?

**दौलत :** मीं संपतनें कोंबडी मारलेली ऐकली !

**कावळे :** ठीक आहे, आतां आणखी एकच प्रश्न. तुम्ही त्या मांजरपाटा-बद्दल आणि छकड्याबद्दल काय म्हणत होतां ?

**दौलत :** माझं मांजरपाट तुम्ही छकड्यांत घालून पळविलं आहे आणि त्याचे पैसे वसूल केल्याशिवाय मी राहाणार नाहीं. मी कांहीं अडाणी बावळा नाहीं !

**कावळे :** ठीक ! माझे प्रश्न संपले.

**मुन्सफ :** खालीं या. प्रतिवादी !

[दौलत जागेवर जाऊन बसतो संपतराव पिंजऱ्यांत जाऊन उभा राहतो.]

**कावळे :** प्रतिवादीचं नांव संपतराव कोंडाजी. धंदा शेतीचा. चांगलं बोलतां येत नाहीं त्याला !

**मुन्सफ :** चालेल. वेळ थोडा आहे. हं, संपतराव, म्हणा, देवा- शपथ खरं सांगेन— ( क्षणभर थांबून ) अहो म्हणा ना माझ्या मागून— देवा

शपथ-- (वकीलाकडे वळून) का हो, याला थोडं तरी बोलतां येतं कीं नाहीं !

कावळे : होय महाराज, तसं चांगलं बोलतां येतं !

मुन्सफ : म्हणा देवाशपथ– ( मोठ्या आवाजांत ) तुम्हांला ऐकायला येत कीं नाहीं ?

संपत : कुकूऽऽऽच कूऽऽऽ

मुन्सफ : ( स्तिमित होऊन ) अं ?

संपत : कुकूऽऽऽच कूऽऽऽ

मुन्सफ : ( मान पुढें करून ) काय म्हणालांत ? पुन्हां बोला !

संपत : कुकूऽऽऽच कूऽऽऽ

मुन्सफ : काय हो वकील, हें काय प्रकरण आहे ? डोक्यांत ढिला आहे कीं काय हा ?

कावळे : होय महाराज. गेले कांहीं दिवस तो जरा चमत्कारिक वागतो आहे हें खरं आहे. वस्तुतः संपतराव देशमुख हा शिरगांवातील एक अत्यंत सज्जन, पापभीरू आणि प्रामाणिक असा शेतकरी आहे. आणि म्हणूनच आपल्यावर कोंबडी चोरल्याचा किळसवाणा आरोप यावा या गोष्टीनं त्याच्या अंतःकरणाला तीव्र दुःख झालं आहे. त्या दुःखामुळंच त्याच्या डोक्यावरहि परिणाम झालेला आहे.

मुन्सफ : (घड्याळ पहात) कावळे वकील, हा खटला असाच आणखी कांहीं वेळ चालला तर माझ्यासुद्धां डोक्यावर परिणाम होण्याचा संभव आहे. ठीक आहे. तुम्हांला प्रतिवादीला कांहीं विचारायचं असेल तर विचारा. नंतर मी लगेच निकाल देतों.

कावळे : होय महाराज. संपत पाटील, मी काय म्हणतों इकडे नीट लक्ष द्या. या दौलत दादाजीची कोंबडी मारल्याचं तुम्हांला आठवतं कां ?

संपत : कुकूऽऽऽच कूऽऽ

कावळे : नीट उत्तर द्या. तुम्ही आषाढ दशमीला कोंबडीचं कालवण केलंत, ती कोंबडी कुठून आणली तुम्ही ?

संपत : कुकूऽऽऽच कूऽऽ

कावळे : ( ओरडून ) मी म्हणतों तें लक्षांत येतं कां तुमच्या ?

संपत : कुकूऽऽऽच कूऽऽ

कावळे : न्यायाधीश महाराज, प्रतिवादीला प्रश्न विचारून कांहीं उपयोग होईल अस मला वाटत नाहीं. ह्या अनपेक्षित संकटामुळं त्याचं डोकं ताळ्यावर राहिलेलं नाहीं—

मुन्सफ : [ कागदपत्र आवरून ] होय. तेंहि शक्य आहे. पण हेंहि शक्य आहे, कीं हें सारं बनावट आहे. त्याचं डोकं आपल्या सर्वांच्यापेक्षां जास्त काम करीत असावं हेंहि अगदींच असंभवनीय नाहीं. पण खोलांत जायला मला सवड नाहीं. वेळ थोडा आहे. वादीची फिर्याद त्याच्या स्वतःच्या आणि साक्षीदाराच्या जबानीवरच अवलंबून आहे. ह्या दोन्हीं जबान्या समाधानकारक नाहींत. वादींनं आपल्या जबानींत असंबद्धतेचा कळस केला आहे. साक्षीदाराला दिवस सांगतां आला नाहीं. त्याची चोरीची माहितीहि ऐकीव आहे. वादीनं ही घटना प्रत्यक्ष पाहिल्याचं सांगितलं, पण तें त्याला सिद्ध करतां आलं नाहीं. त्यानं फक्त आवाज ऐकले. केवळ आवाजावरून काढलेले निष्कर्ष मान्य करणें कठीण आहे. आतां इथें कोंबडीचे आवाज आपण ऐकले. पण त्यावरून वकीलानें काढलेला निष्कर्ष वेगळा आणि माझा निष्कर्ष वेगळा. तेव्हां आवाजाची गोष्ट पुरावा म्हणून निरुपयोगी आहे. दौलत दादाजी-- तुमचे वकील आले नाहींत ही खरोखर दुर्दैवाची गोष्ट आहे. पण आतां त्याला इलाज नाहीं. वेळ थोडा आहे. खटल्याचा निकाल प्रतिवादीतर्फे लागल्याचें मी जाहीर करतों.

[ मुन्सफ घड्याळ पाहून उठतात व बाहेर जातात. त्यांच्यामागोमाग शिरस्तेदार पट्टेवाला व प्रेक्षकहि जातात.]

दौलत : (जातां जातां) कावळेसाहेब, मांजरपाटाचे पैसे वसूल केल्याशिवाय मी राहणार नाहीं, लक्षांत ठेवा !

**कावळे :** तुम्हांलाच बदनामीबद्दल भुर्दंड भरावा लागेल हें तुम्हीहि लक्षांत ठेवा. आजच्यासारखीच पुन्हां फजिती होईल.

**दौलत :** माझी काय फजिती झाली ! दीड दमडीची कोंबडी गेली तर गेली! पण संपतरावासारख्या संभावित माणसाला मी चारचौघांत कोंबड्यासारखं ओरडायला लावलं. बस् झालं. आतां तुम्हांला मांजर-पाटाबद्दल मांजरासारखं ओरडायला लावीन. [ जातो. ]

**कावळे :** (संपतच्या पाठीवर थाप मारीत) शाबास संपतराव ! बहार केलीत अगदीं. अखेर डोकं लढवून तुमचा खटला मीं जिंकून दाखविला. अजून कांहीं शंका नाहीं ना ?

**संपत :** ( हळूहळू दूर सरकत) कुकूऽऽऽच कूऽऽ

**कावळे :** वा! वा ! छान. आणखी दोनचार दिवस असंच ठेवा हें सोंग. बरं, मला आतां दीडची मोटार गांठायची आहे. आपला व्यवहार पुरा करून टाकू, वीस रुपये ठरले नाहीं कां ! खरं म्हणजे पांच रुपये जास्त द्यायला हवे तुम्ही. पण चालेल, एकदां ठरलं तें ठरलं. ही घ्या वकीलफीची पावती !

**संपत :** कुकूऽऽऽच कूऽऽ

**कावळे :** वा ! वा ! कमाल केलीत बुवा आज. ठीक, आतां गाडीची वेळ होत आली चला, लवकर निघालं पाहिजे. काढा, पैसे काढा.

**संपत :** कुकूऽऽऽच कूऽऽ

[ तार स्वरांत वरील शब्द उच्चारतो व एकदम बाहेर पळतो. ]

**कावळे :** अहो- अहो- माझी फी- माझी फी- माझी फी द्याना !

[ पगडी सांभाळीत संपतच्या मागें धावतो- बाहेरून पुन्हा आवाज येतो-

कुकू ऽ ऽ च कू ऽ ]

**वाङ्मय विहार**

**आगामी प्रकाशन**

**स्वल्पविराम**

**श्री. व. चिं. सहस्रबुद्धे** यांच्या

उत्कृष्ट विनोदी कवितांचा संग्रह

**सोन्याचा देव**

**श्री. वि. वा. शिरवाडकर** यांनी अनुवादिलेली

संमेलनास योग्य अशी एकांकिका.

मुद्रक --

द. शं. पोतनीस

गावकरी प्रेस नाशिक.